**कोकण पॅकेज अंतर्गत तिलारी प्रकल्पावर आधारित १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र व पर्यटन स्थळांसाठी पाणी पुरवठा योजनेस (जि.सिंधुदूर्ग) प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु-१४०९/प्र.क्र.१४८/पापु-०६,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ०१ जून, २०११**

**वाचा :-** १) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.कोविका-२००९/प्र.क्र.६/का-१४२०,दि.२५.८.२००९
२) सदस्य सचिव मजीप्रा यांचे मजीप्रा/सस/तांशा-१/कोविका/९१५, दि. १०/८/२००९
३) सदस्य सचिव मजीप्रा यांचे मजीप्रा/सस/तांशा-१/कोविका/५१७ दि. २६/३/२०१०
४) सदस्य सचिव मजीप्रा यांचे मजीप्रा/सस/तांशा-१/८०४/१०५० दि. १२/७/२०१०
५) सदस्य सचिव मजीप्रा यांचे मजीप्रा/सस/तांशा-१/८०४/१७४० दि. २२/११/२०१०

**प्रस्तावना :-**

सिंधुदूर्ग येथे दि. २४.६.२००९ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये कोकण पॅकेज अंतर्गत तिलारी प्रकल्पावर आधारित औद्योगिक क्षेत्रासाठी व पर्यटन स्थळासाठी पाणी पुरवठा योजना तसेच मालवण पर्यंत शहर व गावाच्या योजना घेण्यास नियोजन विभागाच्या दि.२५.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. सदर योजना हाती घेण्यापूर्वी या योजनेची तांत्रिक व आर्थिक बाजू समजून घेण्यासाठी सविस्तर अभ्यास करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सल्लागारामार्फत प्रस्ताव तयार केला होता. त्यानुसार महाराष्ट् जीवन प्राधिकरणाने एकत्रित सादर केलेल्या अहवालानुसार तिलारी प्रकल्पावर आधारित १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र व पर्यटन स्थळांसाठी रु.२१६.९० कोटी इतक्या किंमतीची पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्रान्वये शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे. त्या अनुषंगाने तिलारी प्रकल्पावर आधारित सदरहू पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** तिलारी प्रकल्प हा उद्‌भव घेऊन १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र व पर्यटन स्थळांसाठी पाणी पुरवठा योजना राबविण्याची आवश्यकता त्या अनुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सादर केलेला प्रस्ताव विचारात घेऊन तिलारी प्रकल्पावर आधारित १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र व पर्यटन स्थळांसाठी पाणी पुरवठा योजनेच्या रु.२१६.९० कोटी इतक्या किंमतीच्या प्रस्तावास/आराखड्यास सक्षम प्राधिकाऱ्याने तांत्रिक मान्यता प्रदान करण्याच्या तसेच खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जलसंपदा विभागाकडून पाणी आरक्षणाची व उद्‌भव स्थान निश्चित करुन त्याप्रमाणे बांधकाम करण्याच्या परवानगीची पडताळणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने निविदा काढणेपूर्वी करावी.

२) मे.उत्तम स्टील कंपनी यांनी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाबरोबर केलेल्या द्विपक्षीय करारनाम्यानुसार या योजनेचा आर्थिक सहभाग खालीलप्रमाणे राहील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अ) | शासन अनुदान | (३५%) | - | रु. **७५१८.२४ लक्ष** |
| ब) | मे.उत्तम स्टील कंपनी | (६५%) | - | रु. **१४११९.०८ लक्ष** |
| | | **एकूण** | | **रु. २१६३७.३२ लक्ष** |

३) सदर योजना शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या वतीने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची योजना म्हणून राबविण्यात यावी.

४) सदरच्या योजनेची कामे पूर्ण झाल्यानंतर या योजनेची पुढील ३० वर्षे दैनंदिन देखभाल व दुरुस्ती प्राधिकरणामार्फत करण्यात यावी. तसेच योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वाढ करण्याचे अधिकार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या वतीने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास राहतील. सदरची पाणीपट्टी आकारतांना प्राधिकरणामार्फत भागभांडवलापोटी शासनामार्फत गुंतवणूक करण्यात आलेली रक्कम, दैनंदिन देखभाल दुरुस्तीकरीता येणारा खर्च अधिक प्राधिकरणाच्या इतर खर्चापोटीची १०% वाढीव रक्कम गृहीत धरुन पाणीपट्टीचे दर आकारण्यात यावेत.

५) प्रस्तुत योजना शासनाच्या प्रचलित धोरणानुसार राबविण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

६) या योजनेमधून मे.उत्तम स्टील कंपनीने करारनाम्याप्रमाणे पाणी वापरणे आवश्यक राहील.

७) जादा किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापूर्वी तसेच मंजूर दरापेक्षा जास्त दराने साहित्य (उदा.पाईप्स इ.) घेण्यापूर्वी शासनाची परवानगी घ्यावी.

८) योजनेतील कामे टप्पा-टप्प्याने हाती घेण्यात यावीत. तथापि, प्राथम्याने उद्‌भवाचे काम हाती घेऊन उद्‌भव पूर्णपणे विकसित झाल्याशिवाय इतर कामे हाती घेण्यात येऊ नयेत.

९) सदर योजनेतील उपभोक्ता ग्राहकांनी/संस्थांनी त्यांच्या नळजोडणीवर जलमापक बसविणे बंधनकारक करावे. ठोक पाणी पुरवठ्याचे मोजमाप होण्यासाठी जलकुंभानजीक जलमापके बसविण्यात यावीत. तसेच पाण्याच्या देयकांची वसुली १००% होईल अशी व्यवस्था महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावी.

१०) सदर योजनेत समाविष्ट गावे, मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र व पर्यटन स्थळे यांच्याकडून मागणी नोंदविल्यानंतर महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व संबंधित संस्था यांच्यामध्ये तातडीने व्दिपक्षीय करार करण्यात यावा.

११) सदरची योजना राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाखाली न घेता राज्यस्तरीय योजना म्हणून घ्यावी. तसेच सदर योजनेचा समावेश महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कृती आराखड्यात करण्यात यावा.

१२) योजनेत समाविष्ट असलेल्या सर्व संस्थाकरीता (उदा.गावे/वाड्या,औद्योगिक क्षेत्रे व पर्यटन स्थळे) टॅपींग पर्यतची कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावीत. टॅपींगपासून पुढील अंतर्गत वितरणाची कामे संबधीत संस्थांनी त्यांच्या स्वखर्चाने करावयाची आहेत. तसेच घरगुती वापराकरीता प्रस्तावित पाणी पुरवठा योजनेअंतर्गत वितरण व्यवस्थेची आवश्यक कामेही संबंधित ग्रामपंचायतीने व नगरपरिषदेने स्वखर्चाने करावयाची आहेत.

१३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सदरचा प्रकल्प पूर्ण करण्यासाठी ३ वर्षाचे नियोजन करावे आणि त्याप्रमाणे वर्षनिहाय तरतूद प्रस्तावित करुन वेळोवेळी अहवाल शासनास सादर करावा.

२. या योजनेवर होणारा खर्च (मागणी क्र.वाय-२), २२१५-पाणी पुरवठा-१०२-ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-(बी) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने-४१-सहाय्यक अनुदान (एक) (डब्ल्यूएस-६) (राज्य क्षेत्र) या पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती/जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ १२१७) या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली नोंदवावा व त्या अर्थशिर्षाखाली उपलब्ध केलेल्या तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११.७.२००१ मधील उपविभाग-३ मधील अ.क्र.६ समोरील परिच्छेद क्र.२७(अ) अनुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक 201106011458040001 असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**Sd/-**
**( सु. रा. कळसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१/२,मुंबई/नागपूर.
महालेखापाल, लेखापरीक्षा , महाराष्ट्र १/२/मुंबई/नागपूर.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोकण विभाग, ठाणे,
वित्तीय सल्लागार व मुख्या लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, महाराष्ट्र शासन, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल, जि.रायगड
कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग,कणकवली,जि.सिंधुदुर्ग
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग
ग्रंथपाल, ग्रंथालय, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
सर्व मा. विधान सभा/परिषद सदस्य
मा. मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे विशेष कार्य अधिकारी,
मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व. वि., मंत्रालय ,मुंबई
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, संगणक कक्ष
निवडनस्ती कार्यासन पापु-६